**नागरी सहकारी पतसंस्थांना लागू करण्यात आलेल्या सामोपचार परतफेड योजनेस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीआर-११०६/प्र.क्र.१/पुनर्बांधणी-१/७-स,**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १२ जून, २०२०

**वाचा:-**

१) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २७.९.२००७
२) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १.९.२००८
३) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४.७.२००९
४) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १.८.२०१०
५) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक ९.१२.२०११
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २१.५.२०१२
७) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १९.०७.२०१२
८) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २५.९.२०१३
९) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २६.३.२०१५
१०)शासन निर्णय समक्रमांक दिनांक ६.६.२०१८
११)शासन शुद्धीपत्रक समक्रमांक दिनांक १९.१०.२०१८
१२)सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे दि. २७.३.२०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी सहकारी पतसंस्थांना वसुल न झालेल्या थकीत कर्जाची तरतूद करावी लागत असल्याने पतसंस्थांच्या अनुत्पादक मत्तेत (NPA) वाढ होत आहे. त्यामुळे पतसंस्थांना मोठया प्रमाणावर तरतूदी कराव्या लागत आहेत. त्यामुळे पतसंस्थांच्या स्वनिधीवर परिणाम होत आहे. त्यामुळे ठेवीदारांमध्ये असुरक्षिततेची भावना निर्माण होत आहे. त्याचा परिणाम नागरी सहकारी पतसंस्थांच्या ठेवी कमी होण्यामध्ये व काही ठिकाणी मोठया प्रमाणावर ठेवी काढण्यात येत असल्याने काही पतसंस्था अडचणीत आल्या आहेत. पतसंस्थांच्या कर्ज वसुलीमध्ये भरीव कामगिरी दिसून येत नाही. पतसंस्थांचे ताळेबंद स्वच्छ करण्याच्या उद्देशाने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या शिफारशी लक्षात घेऊन राज्यातील सर्व नागरी सहकारी पतसंस्थासाठी समोपचार परतफेड योजनेस दि. २७/९/२००७ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली होती. या योजनेच्या माध्यमातून झालेल्या वसुलीच्या अनुषंगाने सामोपचार परतफेड योजनेस संदर्भाधिन क्र. २,३,४,५,६,७,८ ९ व १० नुसार मुदतवाढ देण्यात आली होती.

या योजनेद्वारे पतसंस्थांच्या वसुलीमध्ये होणारी भरीव कामगिरी विचारात घेऊन सदर योजनेस दि. ३१/३/२०२१ पर्यंत मुदतवाढ द्यावी असा प्रस्ताव सहकार आयुक्त यांच्याकडून दि. २७/३/२०२० रोजीच्या पत्रान्वये शासनाकडे प्राप्त झालेला आहे. सहकार आयुक्त यांची सदरहू योजनेला मुदतवाढ देण्याबाबतची शिफारस विचारात घेऊन राज्य शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

शासन निर्णय, समक्रमांक दि. २७.९.२००७ अन्वये नागरी सहकारी पतसंस्थांसाठी राबविण्यात आलेल्या " सामोपचार परतफेड योजनेस " दि. ३१ मार्च, २०२१ पर्यंत खालील नमूद केलेल्या अटींसह मुदतवाढ देण्यात येत आहे.

**अ)** अनुत्पादक कर्ज धरण्याचा ( कर्ज एन पी ए ठरविण्यासाठी कट ऑफ डेट ) कालावधी दिनांक ३१ मार्च, २०१८ निश्चित करण्यात यावा.

**ब)** ज्या तडजोडीचा व्याजदर १२% करण्यास तसेच, कर्जदार तडजोडीची रक्कम एक रक्कमी भरण्यास तयार असल्यास ८% दराने व्याजाची आकारणी करण्यास मुभा असावी . तथापि परतफेडीचा दर Cost of Fund पेक्षा जास्त असू नये.

**क)** या योजनेंतर्गत अर्ज करण्याची शेवटची तारीख दिनांक २८.२.२०२१ राहील. सदर योजनेंतर्गत प्राप्त झालेल्या अर्जावर संचालक मंडळाने दिनांक ३१.३.२०२१ अखेर निर्णय घेणे आवश्यक राहील.

या योजनेचे स्वरुप / तपशिल दि. २७.९.२००७ च्या शासन निर्णयाप्रमाणेच राहील. यामध्ये बदल करता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१२१५२०२६८२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.06.12 15:28:37 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

**अवर सचिव तथा सहनिबंधक, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.

३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी व सचिव, दि महाराष्ट्र अर्बन को. ऑप. क्रेडीट

सोसायटीज फेडरेशन, लि. कोल्हापूर.

५. अध्यक्ष, दि महाराष्ट्र अर्बन को. ऑप. क्रेडीट सोसायटीज असोसिएशन लि. मुंबई.

६. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदरहु शासन निर्णयास प्रसिध्दी माध्यमांमार्फत विस्तृत प्रसिध्दी द्यावी.

७. निवड नस्ती.

**प्रत माहितीस्तव:-**

मा. प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई-३२